**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०३१७/प्र.क्र.२२५/दहा/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ०३ ऑगस्ट, २०१७.

**विषय** :- ६०० पोलीस निवासस्थाने, मरोळ, अंधेरी (पूर्व), मुंबई, येथील **प्रकार “ई” च्या इमारती क्रमांक ई-१६ ते ई-१८** यांची संरचनात्मक दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(१२)/२४३४/२०१७, दिनांक १८.०३.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे ६०० पोलीस निवासस्थाने, मरोळ, अंधेरी (पूर्व), मुंबई, येथील येथील **प्रकार “ई” च्या इमारती क्रमांक ई-१६ ते ई-१८** यांची संरचनात्मक दुरुस्ती करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उप-विभागीय अभियंता, अंधेरी (सार्वजनिक बांधकाम) उप-विभाग, अंधेरी (पश्चिम), मुंबई, यांनी सन २०१७-१८ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.४,४४,३५,९३०/-इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. उक्त खर्चाचे अंदाज हे कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सार्वजनिक बांधकाम) विभाग, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व त्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, ६०० पोलीस निवासस्थाने, मरोळ, अंधेरी (पूर्व), मुंबई, येथील येथील **प्रकार “ई” च्या इमारती क्रमांक ई-१६ ते ई-१८** यांची संरचनात्मक दुरुस्ती करण्यासाठी **रु.४,४४,३५,९३०/-**इतक्या खर्चाच्या अंदाजास, (१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये, (२) खर्चाचे अंदाज मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, मुंबई आणि पोलीस सह-आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करावे, या अटींवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा बी-१, मुख्य लेखाशीर्ष, २०५५, पोलीस (०२), शहर पोलीस, शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३५१/इमा-२, दिनांक ०३.०८.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०८०३१८४८२६५३२९ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.03 18:40:25 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस सह-आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, मुंबई.
४) अपर पोलीस आयुक्त (सशस्त्र पोलीस), बृहन्मुंबई, मुंबई.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, मुंबई *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दिलेल्या "Abstract" च्या प्रतीसह).*
६) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दिलेल्या "Abstract" च्या प्रतीसह).*
७) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सार्वजनिक बांधकाम) विभाग, अंधेरी (पश्चिम), मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
११) निवड फाईल (पोल-७).